# डब्ल्यू. ई. बी. ड्यू बॉइस

## शांततेचा पाईक

लेखक: कॅथरीन हक्स चित्रे: डेव्हिड हकीन्स.



डब्ल्यू. ई. बी. ड्यू बॉइस तब्बल एक शतक दीर्घ आयुष्य जगले. या काळात संयुक्त राज्य अमेरिकेच्या इतिहासात अनेक वादळी संकटे आली. ड्यू बॉइस एनएएसीपीच्या संस्थापकांपैकी एक होते आणि या संघटनेचे मुखपत्र क्रायसिसचे संपादक म्हणून प्रसिद्ध होते. पण त्याचबरोबर ते एक प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ, लेखक, इतिहासकार आणि नागरी हक्कांचे पुरस्कर्ते होते.

आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दशकात त्यांनी आपले लक्ष आंतरराष्ट्रीय शांतता चळवळीवर केंद्रीत केले. विश्व शांतीच्या त्यांच्या चळवळी पाहून अमेरिकाविरोधी चळवळ समितीने, साम्यवादी विचारांवर श्रद्धा असणारी व्यक्ती असा ठपका त्यांच्यावर ठेवला. खरंतर, हा अमेरिकेसाठी साम्यवाद विरोधाचा किंवा लाला भयाचा काळ होता. ड्यू बॉइसचा गुन्हा हाच होता की ते जगाकडे इतरांसारखे झापडबंद पद्धतीने बघत नव्हते. त्यांनी आपला मार्ग स्वत:च शोधला आणि तसे जीवन जगू लागले.

ड्यू बॉइस हे अमेरिकी, विशेषत: आफ्रिकी-अमेरिकी, लोकांच्या इतिहासातील एक महत्त्वाचे पान आहे. त्यांचा जन्म 1868 साली अमेरिकेची नवनिर्मिती होताना झाला. त्यांचा मृत्यू 1963 मध्ये वॉशिंग्टन *ग्रेट मार्च* च्या काही तास अगोदर झाला. त्यांचे जीवन आणि विचार यांनी आधुनिक नागरी आंदोलनाला स्फूर्ती मिळाली.

# डब्ल्यू. ई. बी. ड्यू बॉइस

## शांततेचा पाईक

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



बेंजामिन एल्. हुक्स

ही गोष्ट आहे *डब्ल्यू. ई. बी. ड्यू बॉइस* यांची. लोक त्यांना अमेरिकेतील आद्य कृष्णवर्णीय बुद्धिजीवी मानतात. यात काही शंका नाही की स्पष्टवक्ता बॉइस हे कित्येक वर्षे फक्त अमेरिकेतच नाही तर जगातील इतर भागांमध्येही कृष्णवर्णीय लोकांच्या आकांक्षांचा बुलंद आवाज होते.

ड्यू बॉइस हे काळ्या अमेरिकी लोकांच्या हक्कांचे खंदे समर्थक होते. पण खरंतर ते साऱ्या विश्वाचे हितचिंतक होते. विश्वशांती हे त्यांचे स्वप्न होते.

ड्यू बॉइस हे थोर विद्वान होते. त्यांनी आफ्रिकी गुलामांच्या व्यापाराचा इतिहास लिहिला. त्यांचे पुस्तक *द फिलाडेल्फिया निग्रो* हे समाजशास्त्रात मैलाचा दगड मानतात. अनेक लोक त्यांना *द सोल्स ऑफ ब्लॅक फोक* मध्ये संकलित त्यांच्या जहाल लेखांसाठी ओळखतात.

ड्यू बॉइस हे *नॅशनल असोसिएशन फॉर द ॲडव्हान्समेंट ऑफ द कलर्ड पीपल (एनएएसीपी)* चे एक संस्थापक सदस्य होते. आपल्या दीर्घायुष्यकाळात ते कायम एक वादग्रस्त व्यक्ती ठरले. पण आज बहुतांशी लोक मानतात की ते निर्भयपणे आपल्या तत्वांशी एकनिष्ठ राहिले.



विल्यम ग्रेट बॅरिंग्टनमधील सर्व ऋतुंची मजा घेत असे.

# डोंगरकुशीतील गाव

1868 साली नागरी युद्ध संपले त्याला तीन वर्षे झाली होती. दक्षिण अमेरिकेतील पूर्वीचे गुलाम आशेने आपले नवे स्वातंत्र्य पारखत होते. नव्या समाजाच्या या पुनर्रचना प्रक्रियेपासून उत्तर अमेरिका फार दूर होती. इथेच *विल्यम एडवर्ड बर्गहार्ट ड्यू बॉइस*चा जन्म झाला.

विल्यम उत्तर भागातील निग्रो होता. त्याच्या आईचे बर्गहार्ट कुटुंब पिढ्यानपिढ्या मॅसेच्युसेट्स राज्यातील *ग्रेट बॅरिंग्टन* गावात राहात होते. मोठ्या डोंगरराजींमध्ये वसलेल्या या शांत, सुरक्षित गावातील बर्गहार्ट कुटुंब येथील सर्वात जुन्या रहिवाश्यांपैकी होते आणि त्यामुळे गावातील लोक त्यांचा फार आदर करत.

विल्यमचे वडील, *आल्फ्रेड ड्यू बॉइस*, या भागात नवीनच होते. बर्गहार्ट कुटुंबाने त्यांचा स्वीकार कधीच केला नाही. विल्यम लहान असताना आल्फ्रेड ग्रेट बॅरिंग्टन सोडून गेले आणि पुन्हा परतले नाहीत. विल्यमचे संगोपन त्यांच्या आईने, मेरीने केले. इतरांच्या घरांची देखभाल आणि घरभाडे यावर त्यांचा उदरनिर्वाह चालत असे.

ग्रेट बॅरिंग्टन मुलांसाठी जणू स्वर्गच होते. उन्हाळ्यात विल्यम नदीत, ओढ्यात पोहत असे, हिरव्याशार शेतांमध्ये पळत असे, गुहांमध्ये आणि फळबागांमध्ये भटकत असे, डोंगरांवर चढत असे. हिवाळ्यात तो बर्फावर स्केटींग करत असे.

चर्च हा विल्यमच्या सुरुवातीच्या आयुष्यकाळाचा महत्त्वाचा भाग होता. तो आणि त्याची आई घरानजिकच्या चर्चमध्ये जात असत. त्याला रविवारची शाळा विशेष करून आवडत असे. तो शिक्षकांना कठीण प्रश्न विचारत असे.

विल्यमला ग्रेट बॅरिंग्टनच्या डोंगरकुशीतील जगाच्या बाहेरची पहिली झलक *जॉनी मॉर्गन* यांच्या पुस्तकांच्या दुकानातून मिळाली. मॉर्गनसाहेबांना छोटा विल्यम आवडत असे. तिथे विल्यमला पुस्तके आणि मासिके चाळायची सूट मिळत असे. एकदा विल्यमला तिथे इंग्लंडच्या इतिहासाचे पाच खंड दिसले. पण त्यांची किंमत खूप जास्त होती. मॉर्गन यांनी विल्यमला खंडांची किंमत हप्त्याहप्त्याने देण्याची सवलत दिली. त्यांनी मेसॅच्युसेट्स वृत्तपत्रात बातमीदार म्हणून नोकरी मिळवण्यास विल्यमला मदत केली.

हायस्कूलच्या तिसऱ्या वर्षात शिकत असताना, विल्यमला *न्यू बेडफोर्ड* शहरात असलेले आपले आजोबा *अलेक्झांडर ड्यू बॉइस* यांनी भेटायचे आमंत्रण दिले. हा त्याचा बाहेरच्या जगातील पहिला प्रवास होता.

तिथे विल्यम कमी वेळ राहिला पण त्याच्यावर आजोबांचा बराच प्रभाव पडला. आजोबांचे वागणे, पाहुण्यांचे स्वागत करण्याची औपचारीक पद्धत, त्यांचा घरंदाजपणा हे सगळं बर्गहार्ट कुटुंबापेक्षा वेगळे होते.

घरी परतताना आजोबांचे एक मित्र विल्यमला सोडायला आले. वाटेत ते ऱ्होड आयलंड राज्याच्या *प्रोविडेन्स* या शहरात जेवायला थांबले. तिथे आफ्रिकी वंशाचे हजारो लोक वेस्ट इंडियन स्वातंत्र्याचा सोहळा साजरा करत होते. विल्यमने याआधी कधी इतकी विविध वर्णांची माणसे पाहिली नव्हती. त्याला आपल्या आफ्रिकी वारशाचा अभिमान वाटला.




विल्यमने याआधी कधी इतकी विविध वर्णांची माणसे पाहिली नव्हती.




शाळेच्या एका नव्या विद्यार्थिनीने विल्यमचे व्हिजिटिंग कार्ड घेण्यास नकार दिला.

दक्षिण भागातील काळ्या लोकांना ज्या समस्या भोगाव्या लागल्या त्यापासून विल्यम कोसो दूर होता. पण शाळेतील एका घटनेने विल्यमला जाणवले की सत्य काही वेगळेच होते. त्याकाळी असा रिवाज होता की विद्यार्थी एकमेकांना आपली व्हिजिटींग कार्ड देत असत. एका नव्या विद्यार्थिनीने विल्यमचे कार्ड घेण्यास नकार दिला आणि त्याच्याकडे तिरस्काराने पाहिले. विल्यमला जाणवले की तो इतरांपेक्षा वेगळा आहे.

या अपमानने विल्यमला एक चांगला विद्यार्थी बनण्यास उद्युक्त केले. 1883 साली, विल्यमने उच्च गुणांनी पदवी प्राप्त केली. पदवीदान सोहोळ्याप्रसंगी केलेल्या भाषणात विल्यमने *वेन्डेल फिलीप्स* यांच्या कार्यावर प्रकाश टाकला. त्यांनी गुलामगिरी प्रथेला विरोध केला होता. पुढील शिक्षणासाठी विल्यम हार्वर्ड विद्यापीठात जाऊ इच्छित होता.




विल्यमने नॅशविल शहरातील फिस्क विद्यापीठात शिकण्यासाठी ग्रेट बॅरिंग्टन सोडले.

# समज येऊ लागली

विल्यमला शिकण्यासाठी हार्वर्डला जायचे होते, पण नशीबाच्या आणि त्याच्या मित्रांच्या मनात काही वेगळेच होते. पदवी मिळाल्यावर विल्यम हिशोब ठेवण्याचे काम करू लागला. त्याच वर्षी त्याच्या आईचे निधन झाले. तीन स्थानिक लोक त्याचे सल्लागार बनले. त्यांनी विल्यमला *टेनेसी* राज्यातील नॅशविलच्या *फिस्क* विद्यापीठात जाण्याचे सुचवले. तेथील कॉलेज काळ्या लोकांचे होते.

विल्यमचे एक सल्लागार चर्चचे पाद्री रेवरंड *सी.सी.पेंटर* यांच्या मते, विल्यमची भावी कारकिर्द दक्षिण भागात घडू शकली असती. शहरातील अनेक चर्चना मनवून त्यांनी विल्यमच्या शिक्षणासाठी स्कॉलरशीप म्हणून निधी गोळा करण्यास सांगितले.

1885 साली विल्यम फिस्क विद्यापीठात शिकायला निघाला. आपल्या प्रवासाच्या अंतिम टप्प्यावर, त्याची भेट *ऑर्थो पोर्टर*शी झाली. तोसुद्धा तिथेच शिकायला चालला होता. दोघांमध्ये मैत्री झाली आणि त्यांनी सोबत राहायचे ठरवले.



ड्यू बॉइसला दररोज आपल्या घरमालकिणीच्या घरची खुर्ची शाळेत आणावी लागत असे.

फिस्कमध्ये आपण बहुसंख्य काळ्या विद्यार्थ्यांसोबत शिकणार या गोष्टीचा विल्यमला आनंद होता. तिथे गेल्यावर त्याला जाणवले की ग्रेट बॅरिंग्टनमध्ये तो खूप एकाकी होता. आफ्रिकी पूर्वज असलेल्या या लोकांबाबत आपण आणखी ज्ञान मिळवायचे, असा ठाम निश्चय त्याने केला.

आणि खरोखरच विल्यमने बरीच माहिती मिळवली. ज्या विद्यार्थ्यांनी आपल्या दैनंदिन आयुष्यात सतत अपमान सहन केले होते त्यांच्याकडून विल्यमला दक्षिण अमेरिकेतील भयानक परिस्थितीची ओळख झाली. त्यांच्यातील कित्येक विद्यार्थ्यांनी कट्टर वर्णद्वेष, हिंसक जमावाकडून हत्या हे सारे प्रत्यक्ष बघितले होते.

नागरी यद्ध संपून वीस वर्षे लोटली होती. पण दक्षिण भागातील काळ्या लोकांची स्थिती फारशी सुधारली नाही. विल्यमला ही स्थिती सुधारण्यात मदत करायची होती. त्याने उन्हाळ्याच्या सुट्टीत ग्रामीण मुलांना शिकवायचा निर्णय घेतला.

त्याची शाळा लाकडाच्या ओंडक्यांनी बनलेल्या एका खोपटात भरू लागली. या शाळेत तो तीस मुलांना शिकवू लागला. त्याचे टेबल लाकडाच्या तीन तुकड्यांनी बनले होते. बसण्यासाठी खुर्ची तो घरमालकिणीकडून आणत असे. ही खुर्ची दुपारपर्यंत पुन्हा घरमालकिणीला परत करावी लागत असे. शाळेतील मुले दूरदूरहून शिकायला येत असत.



नीग्रो आध्यात्मिक संगीताने ड्यू बॉइसवर खूप प्रभाव टाकला.

विल्यमचे विद्यार्थी लिहा-वाचायला शिकू लागले आणि विल्यम त्यांचे गावातील आयुष्य जाणून घेऊ लागला. तो आपल्या विद्यार्थ्यांच्या कुटुंबासोबत त्यांच्या झोपड्यांमध्ये राहात असे, त्यांच्यासोबत खान-पान करत असे. रविवारी तो त्यांच्यासोबत त्यांच्या चर्चमध्ये जात असे. दक्षिण भागातील चर्चचे रितीरिवाज विल्यमसाठी नवीनच होते. पण तो त्यांची प्रार्थना आदरपूर्वक ऐकत असे. या प्रार्थना अमेरिकी भूमीत जन्मलेल्या नीग्रो लोकांनी रचलेल्या होत्या.

फिस्कमधून पदवी मिळाल्यावर विल्यमने हार्वर्ड विद्यापीठात शिष्यवृत्तीसाठी अर्ज केला. हार्वर्डमध्ये शिकणे हे त्याचे स्वप्न होते. तिथे त्याला तिसऱ्या वर्षाचा विद्यार्थी म्हणून प्रवेश मिळाला. तत्वज्ञान, इतिहास, अर्थशास्त्र, सामाजिकशास्त्र यांचा अभ्यास करताकरताच तो अनेक उपक्रमांमध्ये सहभागी होऊ लागला. पण इथेही त्याला काळा विद्यार्थी म्हणून अपमान झेलावे लागले.

तरीही विल्यमला राष्ट्रीय स्तरावरची ओळख हार्वर्डमध्येच मिळाली. पदवी समारंभात त्याने माजी राष्ट्राध्यक्ष *जेफरसन डेव्हीस* यांच्यावर भाषण केले. जे लोक इतरांना स्वातंत्र्य मिळू नये म्हणून लढत होते, त्यांना डेव्हीस यांनी पाठींबा दिला असे तो भाषणात म्हणाला. देशभरच्या वृत्तपत्रांमध्ये, मासिकांमध्ये या भाषणाची प्रशंसा झाली.

आपले काम सुरू करण्याआधी विल्यमला आणखी प्रशिक्षण हवे होते. त्याने बर्लिन विद्यापीठात अर्ज केला. त्याला शिष्यवृत्ती आणि कर्जही मंजूर झाले. 1892 साली पानगळीच्या ऋतूत त्याचे बर्लिनमधील शिक्षण सुरू झाले.

तो युरोपात दोन वर्षे राहिला. तिथे त्याला जगाकडे बघण्याचा एक नवा दृष्टिकोन मिळाला. गावोगावी आणि खेडोपाडी फिरल्यावर त्याला जाणवले की तिथे अमेरिकेसारखी वर्णभेद ही समस्या नव्हती. माणसाच्या कातडीच्या रंगापेक्षा त्याच्या आतील माणूस तिथे पाहिला जाई. त्यामुळे तिथे विल्यमला पूर्वग्रहरहीत आदर मिळाला.

या अनुभवाने विल्यमला माणसाचा स्वभाव आणि भेदभाव बारकाईने कळला. त्याला काळे अमेरिकी आणि जगातील समस्त शोषीत समूहांमध्ये, विशेषत: आफ्रिका आणि आशियायी देशांतील लोकांमध्ये, सारखेपणा दिसू लागला.



मी डोंगर-दऱ्यांमध्ये, घरांमध्ये, शाळांमध्ये अनोळखी स्त्रीपुरुषांना भेटलो. हळूहळू ते गोऱ्यांऐवजी फक्त माणूस वाटू लागले. जीवनाच्या तळाशी लपलेली एकता मला जखडू लागली – डब्ल्यू. ई. बी. बॉइस.



दक्षिण ओहायोमध्ये ड्यू बॉइस एका वेगळ्याच पेहरावात.

# तरूण विद्वान

1894 साली, अमेरिकेत परतल्यावर, विल्यमला ओहायो राज्यातील *झेनिया* शहरात असलेल्या विल्बरफोर्स कॉलेजात ग्रीक आणि लॅटीन भाषेचा प्राध्यापक म्हणून पहिली नोकरी मिळाली. *आफ्रिकन मेथॉडीस्ट एपिस्कोपल चर्च (एएम्ई)* ने काळ्या विद्यार्थ्यांसाठी या कॉलेजची स्थापना केली होती.

आपल्या युरोपीय वेशभूषेमुळे विल्यम तिथे विचित्र वाटत असे. कॉलेजचे व्यवस्थापक त्याच्या वृत्तीमुळे नाराज होते. त्यांच्या दृष्टिने विल्यम जरा जास्तच उदारमतवादी होता. ड्यू बॉइसही कॉलेजच्या अभ्यासक्रमाने समाधानी नव्हता. दोन वर्षे त्याने अभ्यासक्रमात सामाजिक शास्त्र अंतर्भूत करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला.

पण काही गोष्टींमध्ये तो यशस्वी झाला. त्याने *अमेरिकेच्या संयुक्त संस्थानातील गुलामांच्या व्यापाराचे निर्मूलन – 1638-1870* हा पीएच्.डी. प्रबंध पूर्ण केला. हार्वर्ड विद्यापीठाची डॉक्टरेट मिळवणारा ड्यू बॉइस हा पहिलाच काळा अमेरिकी होता. आता तो डॉ. ड्यू बॉइस म्हणून ओळखला जाऊ लागला.

ओहायोमध्येच त्याची भेट *नीना गोमर*शी झाली. ती विल्बर कॉलेजची विद्यार्थीनी होती. 1896 साली दोघांचे लग्न झाले.

आपल्या पसंतीच्या क्षेत्रात काम करण्याची संधी त्याला पेनसिल्व्हेनिया विद्यापीठात मिळाली. विल्यम आणि त्याची पत्नी फिलाडेल्फिया येथील *सातवा वॉर्ड* या गरीब काळ्या लोकांच्या वस्तीत एक खोली घेऊन राहू लागले. अहोरात्र काम करून विल्यमने त्या भागातील 5,000 लोकांच्या मुलाखती घेतल्या, ग्रंथालयातून आकडेवारी शोधली आणि सातव्या वॉर्डातील लोकांचा मागील दोनशे वर्षांचा इतिहास संकलित केला.

कामातून विश्रांती घेत विल्यम आपल्या पत्नीला ग्रेट बॅरिंग्टन येथे घेऊन गेला. मग तो फिलाडेल्फियाला परतला आणि नीना प्रसुतीसाठी मॅसेच्युसेट्समध्ये राहिली. 1897 साली त्यांचा मुलगा *बर्गहार्ट गोमर ड्यू बॉइस*चा जन्म झाला.



मृत्युच्या सावलीने त्यांच्या मुलावर झडप घातली.

ड्यू बॉइसचे संशोधन *फिलाडेल्फिया नीग्रो* नावाने प्रकाशित झाले. देशभरातील विद्वानांनी त्याचे स्वागत केले. अटलांटा विद्यापीठाचे अध्यक्ष एवढे प्रभावित झाले की त्यांनी विल्यमला अर्थशास्त्र आणि इतिहास विषयांचे प्राध्यापक पद देऊ केले.

ड्यू बॉइस आपली पत्नी आणि तान्ह्या मुलासोबत जॉर्जियात राहायला गेले. तिथेही त्याने आफ्रिकी-अमेरिकी लोकांचा अभ्यास सुरु ठेवला. शिकवण्यासोबतच त्याच्यावर *काळ्या लोकांची दैन्य स्थिती* या विषयावर होणाऱ्या विद्यापीठाच्या वार्षिक संमेलनाची जबाबदारी सोपवण्यात आली. त्याला *अमेरिकेचा अग्रगण्य समाजशास्त्रज्ञ* अशी उपाधी देण्यात आली.

1899 साली, हे यश मिळत असताना त्याला बरीच वैयक्तिक संकटेही झेलावी लागली. दूषित पाणी प्यायल्यामुळे त्याच्या अठरा महिन्याच्या मुलाला आमांश झाला. आजाराच्या दहाव्या दिवशी मृत्युच्या काळ्या सावलीने त्यांच्या मुलावर झडप घातली.

मुलाच्या मृत्यूने नीनाची जगण्याची इच्छाच मरून गेली. पुढल्या वर्षी त्यांना मुलगी झाली, *नीना योलँड ड्यू बॉइस.* पण विल्यमची पत्नी मुलाच्या मृत्युच्या दु:खातून बाहेर पडू शकली नाही.

आपले दु:ख कमी करण्यासाठी विल्यमने स्वत:ला कामात झोकून दिले. त्याने मुलाच्या आयुष्यावर *पहिल्या मुलाचा मृत्यू* हा छोटा लेख लिहिला. 1903 साली, त्याच्या *काळ्या लोकांचा आत्मा* या पुस्तकात हा लेख तेरा इतर लेखांसोबत प्रकाशित झाला. हे पुस्तक त्यांच्या 21 पुस्तकांमध्ये सर्वाधिक वाचले गेले.

*काळ्या लोकांचा आत्मा* हे पुस्तक सामान्य लोकांसाठी लिहिले गेले होते. त्याला चांगला प्रतिसाद मिळाला. त्यात विल्यमने काळे लोक जणू *वर्णाच्या पडद्यामागचे आयुष्य* जगतात असे तो म्हणतो. ड्यू बॉइसच्या मतानुसार, विसाव्या शतकाची समस्या ही वर्णभेदाची समस्या आहे.

# नियाग्रा चळवळ आणि एन्एएसीपीचा जन्म

स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्यावर हस्ताक्षर झाल्यावर स्वातंत्र्य आणि समानता यांच्याविषयी लोकांच्या मनात आशा पल्लवित झाल्या. शतक संपता संपता या आशा पुरत्या कोमेजूनही गेल्या. दक्षिणेची राज्ये काळ्यांना मतदानाचा हक्क आणि सार्वजनिक वाहनांमध्ये गोऱ्या माणसाशेजारी बसण्याची मुभा नाकारणारे कायदे बनवू लागली.

एवढेच नव्हे, हिंसक जमाव काळ्या लोकांना घेरून फाशी चढवू लागला. या हिंसक लोकांना कुणी अटक करत नव्हते, शिक्षा करत नव्हते. वर्णभेदाचा पडदा तिरस्काराच्या आणि रक्ताच्या बळकट धाग्यांनी बनला होता.

1905 मध्ये ड्यू बॉइस आणि एकोणतीस इतर आफ्रिकी-अमेरिकी लोकांनी *नियाग्रा चळवळ* सुरू केली. त्यांनी काळ्यांना मतदानाचा हक्क तसेच न्याय आणि शिक्षणाचे हक्क यांची मागणी केली. आमचा हिंसेवर विश्वास नाही, हेसुद्धा ड्यू बॉइसने स्पष्ट केले.

तरीही उत्तरेकडील प्रमुख शहरांमध्ये वर्णभेदी दंगली उसळल्या. यांतील एक दंगल तर अब्राहम लिंकन यांच्या कबरस्थळापासून दोन मैलांवर असलेल्या स्प्रिंगफिल्डमध्ये दोन दिवस चालली. काळे लोक आपले घरदार सोडून पळून गेले. त्यांची घरे लुटली गेली. सत्तरपेक्षा जास्त लोक गंभीर स्वरुपात जखमी झाले.

वर्णभेदाचा पडदा तिरस्काराच्या आणि रक्ताच्या बळकट धाग्यांनी बनला होता.




डॉ. ड्यू बॉइस एन्एएसीपीचे प्रचार-प्रसार आणि संशोधन संचालक बनले. त्यांनी संघटनेचे क्रायसिस हे मासिक सुरू केले.

दंगलीने दुखावलेल्या लोकांमध्ये पत्रकार, सामाजिक कार्यकर्ते आणि उदारमतवादी लोक सामील होते. या लोकांनी एक संमेलन आयोजीत करायचे ठरवले. त्याद्वारे नागरी आणि राजकीय स्वातंत्र्यासाठी चळवळ पुन्हा सुरू करता आली असती.

ड्यू बॉइस आणि नियाग्रा चळवळीतील इतर सदस्यांना या संमेलनात उपस्थित राहाण्याविषयी विनंती करण्यात आली. हे संमेलन 30 मे ते 1 जून या कालावधीत भरले. या संमेलनाच्या परिणामी, *नॅशनल असोसिएशन फॉर अॅडव्हान्समेंट ऑफ कलर्ड पीपल* म्हणजेच *एन्एएसीपी*ची स्थापना झाली.

डॉ. ड्यू बॉइस एन्एएसीपीचे प्रचार-प्रसार आणि संशोधन संचालक बनले. त्यांनी संघटनेचे *क्रायसिस* हे मासिक सुरू केले. या मासिकात कृष्णवर्णीय लोकांच्या आशाआकांक्षांच्या, त्यांच्या समस्यांच्या नव्या व्याख्या करण्यात आल्या. आफ्रिकी-अमेरिकी कविंच्या आणि लेखकांच्या आवाजाला उभारी आली. या मासिकात *छोट्यांसाठी पाने* या नावाने लहान मुलांसाठी काही भाग राखून ठेवला होता. एक वार्षिक बाल अंकसुद्धा निघू लागला. त्यात मुलांना सखोल शिक्षण देणे किती महत्त्वाचे आहे, हे विशद केलेले असे.

आफ्रिकी-अमेरिकी वंशाच्या लोकांबद्दल प्रामाणिक व अस्सल माहितीची उणीव ड्यू बॉइस यांना सलत होती. त्यांच्याबद्दलचे गैरसमज दूर करण्यासाठी बॉइस *आफ्रिकी देशांचा समृद्ध इतिहास आणि संस्कृती* यावर क्रायसिसमध्ये तसेच इतर प्रकाशनांमध्ये लेख लिहू लागले.




एन्एएसीपी ही एक सशक्त नागरी संघटना बनली.

क्रायसिसमध्ये छापून आलेले लेख वाचून काळ्या लोकांना प्रेरणा मिळू लागली. डॉ. ड्यू बॉइसच्या शब्दांनी आफ्रिकी-अमेरिकी लोकांचा आत्मसन्मान आणि आत्मविश्वास जागृत केला. त्यांच्यात एका न्याय्य जगाची निर्मिती करण्याच्या दिशेत काम करण्याचे धाडस आणि आशा जागवली.

मागल्या काही वर्षांपासून, *बुकर टी वॉशिंग्टन हे* सर्वात लोकप्रिय आफ्रिकी-अमेरिकी नेता होते. ते शिक्षणावर, विशेषतः व्यावसायिक शिक्षणावर जोर देत होते. पण ड्यू बॉइसच्या मते काळ्या लोकांत कुशल कारागीर बनण्यापेक्षा जास्त क्षमता होत्या. काळ्या लोकांनी काय करावे, करू नये हे गोऱ्यांनी ठरवू नये, असे त्याचे ठाम मत होते.

ड्यू बॉइसचे विचार गोऱ्याच नाही तर काही काळ्या लोकांनाही अतिरंजित वाटत. या लोकांना वाटे की काळ्या लोकांनी आपल्या मर्यादेत राहावे. पण ड्यू बॉइसच्या दूरदर्शी दृष्टीने अमेरिका आणि आफ्रिकेतील अनेक देशांत नागरी हक्क चळवळीला प्रेरणा दिली.

# व्यापक मतैक्याचा शोध

ज्या कालावधीत ड्यू बॉइस क्रायसिसचे संपादक होते (1910-1934), तो अमेरिकेच्या इतिहासाचा वादळी काळ होता. याच दरम्यान, पहिले महायुद्ध झाले आणि अमेरिकेत महामंदी आली.

युद्धकाळात देशभरातील वेगवेगळ्या राज्यांतील काळे सैनिक आफ्रिकी वसाहतीतील काळ्या सैनिकांसोबत परक्या भूमीत लढले. युद्ध समाप्तीनंतर, घरी परतल्यावर, त्यांना आपल्या जगाविषयी काही नवीनच जाणवू लागले. त्यांना इतर नागरीकांसारखेच हक्क हवेसे वाटू लागले. मोठ्या शहरांमध्ये नोकऱ्यांची कमतरता होती. गोऱ्या लोकांना धोका जाणवू लागला. 1919 सालच्या उन्हाळ्यात अनेक शहरांमध्ये पुन्हा वर्णभेदी दंगली उसळल्या.

1920च्या दशकात, सामाजिक उलथापालथ होत असताना न्यूयॉर्क शहराच्या *हार्लेम* भागात काही रचनात्मक चळवळीची लाट आली. काळे लेखक, कलाकार, संगीतकार यांना आंतरराष्ट्रीय ओळख आणि सन्मान मिळाला. हार्लेम हे ठिकाण अमेरिकेतील कृष्णवर्णीय नवनिर्मितीची राजधानी म्हणून ओळखली जाऊ लागली. तिथे आफ्रिकी-अमेरिकी लोकांची चेतना आणि कला बहरून आल्या.

ड्यू बॉइसनेही अनेक पुस्तके लिहिली. त्यात त्यांचे आत्मचरित्र आणि कादंबऱ्याही होत्या. त्यांनी आफ्रिकी-अमेरिकींचा इतिहास नाटक माध्यमातून मांडला आणि एक नाट्यसमूह बनवला. क्रायसिस आणि इतर प्रकाशनांतून त्यांनी वर्णभेदी हिंसा, काळ्या लोकांची हत्या आणि गोऱ्यांची मानसिकता यांवर सातत्याने टीका केली.



आफ्रिकी-अमेरिकींची चेतना आणि कला बहरून आल्या.

ड्यू बॉइसच्या कार्याचा सर्वात महत्त्वाचा भाग होता, प्रवास. त्याने युरोपातील अनेक देशांत तसेच रशियात आणि आफ्रिकेत प्रवास केला. या प्रवासाने त्याला जागतिक समस्यांसोबतच आपल्या देशातील वर्णभेद समस्येचे सखोल आकलन झाले. एखादा वंश दुसऱ्या वंशापेक्षा श्रेष्ठ आहे, हा गैरसमज या भेदभावामागे आहे, याची त्याला जाणीव झाली. त्याचे मत होते की जोवर अमेरिका जगातील इतर भागात होत असलेले कृष्णवर्णीयांचे शोषण सहन करत राहील तोवर काळे अमेरिकी या भेदभावातून मुक्त होऊ शकणार नाहीत.

ड्यू बॉइसने *पॅन आफ्रिकी*, म्हणजे *अखिल आफ्रिका चळवळ* सुरू केली, जेणेकरून आफ्रिकी मूळ असलेले सर्व लोक आफ्रिकी वसाहतींच्या स्वातंत्र्यासाठी एक होतील. 1919 साली पॅरीसमध्ये झालेल्या पहिल्या अखिल आफ्रिका संमेलनात फक्त सत्तावन्न प्रतिनिधी आले. 1921 ते 1945 या काळात त्यांनी आणखी चार संमेलने आयोजीत केली. त्यांमध्ये प्रतिनिधींची संख्या वाढत गेली. यामुळे त्याला *फादर ऑफ पॅन आफ्रिकानिझम* असे म्हटले जाऊ लागले.

1945 सालचे आगमन होईपर्यंत, ड्यू बॉइसच्या लोकांच्या हक्कासाठी सुरू असलेल्या चळवळींनी विश्व शांती चळवळींचे स्वरूप धारण केले. त्याच्या मते, लोकांचे स्वातंत्र्य हाच शांततेचा पाया आहे. त्याला अंदाज नव्हता की या चळवळीत एक मोठा अडथळा आपलेच सरकार असेल.



ड्यू बॉइसने काळ्या अमेरिकी लोकांना आपल्या समृद्ध इतिहासाचा आणि संस्कृतीचा अभिमान बाळगण्यासाठी प्रेरणा दिली.






शांतता सूचना केंद्राने अणुबॉंबवर बहिष्कार टाकण्याच्या उद्देशाने स्टॉकहोम आवाहनावर हस्ताक्षर करण्यासाठी अमेरिकी लोकांना प्रोत्साहन दिले.

# राजकीय आव्हाने

दुसऱ्या महायुद्धानंतर पूर्वी दोस्त राष्ट्र असलेल्या सोव्हियेत युनियनसोबत अमेरिकेचे संबंध बिघडले आणि शीत युद्धाचा दीर्घ काळ सुरू झाला. या दोन देशांत कधी युद्ध झाले नाही, पण भय आणि संशयाच्या वातावरणामुळे दोन्ही देशांमध्ये जणू एक पोलादी भिंत उभी राहिली.

हे भय आणि संशय अमेरिकेत एखाद्या संसर्गजन्य रोगासारखा पसरत गेले. लोक साम्यवाद आणि सोव्हियेत रशियाच्या लोकांना सैतान समजू लागले. *विस्कॉन्सिन* राज्याच्या वरिष्ठ कायदेमंडळाचे सदस्य *मॅकार्थी* यांनी लोकांच्या या मानसिकतेला खतपाणी घातले. साम्यवादी झेंड्याच्या लाल रंगामुळे या काळाला *लाल भय* म्हटले जाऊ लागले.

ड्यू बॉइस साम्यवादाबद्दल असलेल्या या भयाच्या विरोधात सतत आवाज उठवत. हे भय संपवण्यासाठी कार्यरत असलेल्या लोकांच्या *एक हजारांची समिती* या एका गटाचा ते भाग बनले. प्रख्यात संशोधक *अल्बर्ट आईनस्टाईन*, नाटककार *लिलियन हेलमन* हेदेखील या समितीचे सदस्य होते. सोव्हियेत युनियन आणि अमेरिकेदरम्यान सहकार्याची भावना वाढावी, यासाठी ड्यू बॉइसने प्रयत्न केले. कारण जागतिक शांततेसाठी हे अत्यंत गरजेचे होते.

ड्यू बॉइस आणि चळवळीच्या इतर कार्यकर्त्यांनी *शांतता सूचना केंद्र* सुरू केले. ते *पीसग्राम* नावाने एक वृत्तपत्र प्रकाशित करू लागले.

शांतता सूचना केंद्राचे कार्यकर्ते अणुबाँबवर बहिष्कार टाकण्यासाठी लोकांची हस्ताक्षरे गोळा करू लागली तेव्हा अमेरिकी सरकारचे त्याकडे लक्ष्य गेले. काही काळानंतर, शांतता सूचना केंद्राला अमेरिकी सरकारकडून एक पत्र आले. त्यात शांतता सूचना केंद्राने आपली नोंदणी परकीय संस्थेची प्रतिनिधी म्हणून करावी, अशी सूचना केली. या सूचनेद्वारे सरकारने शांतता सूचना केंद्र हे साम्यवादी देशांची हस्तक असल्याचा जणू आरोपच केला होता.

लाल भयाच्या या काळात सरकारशी संघर्ष करण्याऐवजी शांतता सूचना केंद्राच्या सदस्यांनी केंद्र बंद करायचे ठरवले. केंद्राचे अध्यक्ष ड्यू बॉइसने सदस्यांना म्हटले की आपण आपला जागतिक शांततेचा संदेश देशाच्या प्रत्येक राज्यात पोहचवलेला आहे.

1948 साली ड्यू बॉइस *काउंसील ऑफ आफ्रिकन अफेअर्स*चे मानद सदस्य बनले. सामान्य जनतेला आफ्रिकेविषयी माहिती देणे आणि आफ्रिकी देशांतील लोकांची मदत करणे, हा काउंसीलचा उद्देश होता. 1950 साली त्यांची पत्नी नीनाचे निधन झाले. गेली त्रेपन्न वर्षे तिने त्याची सोबत केली होती. 27 फेब्रुवारी 1951 रोजी, काउंसीलने ड्यू बॉइसच्या त्र्याऐंशीव्या वाढदिवशी एका मेजवानीचे आयोजन करायचे ठरवले.



त्यांची नियोजित वधू शर्ली ग्रॅहम, त्यांची मैत्रीण आणि अनुयायीसुद्धा होती.

दरम्यान ड्यू बॉइस आणि शांतता सूचना केंद्राच्या इतर चार कार्यकर्त्यांवर सरकारने आरोप ठेवला की त्यांनी परकीय संस्थेची प्रतिनिधी म्हणून केंद्राची नोंदणी केलेली नाही. त्या सर्वांना 16 फेब्रुवारी 1951 रोजी खटल्याच्या सुनावणीसाठी वॉशिंग्टन डी. सी. येथे बोलावण्यात आले.

आपण 16 फेब्रुवारीच्या अगोदर लग्न करु, असा आग्रह शर्ली ग्रॅहमने ड्यू बॉइसकडे धरला. विल्यमला अटक झाली तर पत्नी म्हणून त्याला तुरुंगात भेटण्याचा हक्क तिला मिळाला असता. 14 फेब्रुवारी 1951 रोजी एक छोटासा समारंभ आयोजीत करून त्यांनी लग्न केले.



ड्यू बॉइसच्या बोटांचे ठसे घेण्यात आले, त्यांनी कुठे शस्त्रे लपवली आहेत का याची तपासणी करण्यात आली आणि मग त्यांना बेड्या घालण्यात आल्या.

ड्यू बॉइसने कोर्टाला सांगितले, "ही दु:खद गोष्ट आहे की आम्हाला कोर्टासमोर स्वत:ला अशा गुन्ह्यासाठी निर्दोष सिद्ध करावं लागतंय जो गुन्हा होऊच शकत नाही. अमेरिकी आणि जगभरातील लोक यांच्यामध्ये मैत्री आणि शांततेचा पुरस्कार करणे, हा गुन्हा आहे का? अणुयुद्धाच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या जगात शांतता प्रस्थापित करण्याचे प्रयत्न करणे, हा गुन्हा आहे का?"

शांतता सूचना केंद्राच्या सदस्यांना अंधाऱ्या पायऱ्यांवरून आणि गल्ल्यांमधून नेण्यात आले. त्यांच्या बोटांचे ठसे घेण्यात आले, त्यांनी कुठे शस्त्रे लपवली आहेत का याची तपासणी करण्यात आली आणि मग त्यांना बेड्या घालण्यात आल्या. नंतर प्रत्येकाला एक हजार डॉलरच्या जामीनावर सोडण्यात आले. कोर्टाचा निकाल अद्याप आला नव्हता पण वृत्तपत्रांनी विल्यमला गुन्हेगार म्हणून सादर केले.

या प्रतिकूल परिस्थितीत 27 फेब्रुवारी रोजी मित्र आणि कुटुंबीय यांच्या समोर ड्यू बॉइस आणि शर्ली ग्रॅहम यांचे लग्न झाले. पण त्यांच्यासमोर खटल्याच्या खर्चाची समस्या होती. त्यांनी देशाच्या विविध भागात भाषणांचे दौरे करण्याची योजना आखली. त्यातून निधी जमवता आला असता आणि त्यांच्या परिस्थितीचा प्रचार-प्रसार झाला असता.

भाषणाच्या दुसऱ्या दौऱ्यात, शिकागो शहरात पंधरा हजार तरूण शांतता कार्यकर्त्यांसमोर भाषण दिल्यावर ड्यू बॉइसने शर्लीला म्हटले, "देशातील तरूण वर्ग जागृत होत आहे. आज ते प्रश्न विचारतायत. उद्या ते बदल घवून आण्यासाठी कार्यरत होतील. त्यांना सत्य परिस्थिती ऐकायची आहे. मी प्रामाणिकपणे वस्तुस्थिती स्पष्ट केली. त्यांनी निर्भयपणे माझ्याशी गप्पा मारल्या."

इकडे ड्यू बॉइसला आंतरराष्ट्रीय स्तरावर समर्थन मिळू लागले. न्याय विभागात जगभरातून पत्रे आणि तारा येऊ लागल्या. नोव्हेंबर 1951 मध्ये खटला सुरू झाला. ड्यू बॉइस आणि त्याचे सहकारी निर्दोष सुटले. पण गरज वाटली तर अल्बर्ट आईनस्टाईन त्यांच्या बाजुने साक्ष देण्यास तयार होते.

सगळ्या आरोपांतून निर्दोष सुटले तरी लोक विल्यमकडे संशयी नजरेने पाहू लागले. व्यावसायिक प्रकाशने त्यांची पुस्तके आणि वृत्तपत्राचे लेख छापण्यास नकार देऊ लागले. कॉलेजांनी त्यांना भाषण देण्यासाठी निमंत्रण देणे बंद केले.

1952 साली, ड्यू बॉइस आणि त्यांच्या पत्नीने पासपोर्टसाठी अर्ज केला. पण त्यांना सांगण्यात आले की ते साम्यवादी पक्षाचे सदस्य नाहीत असे त्यांनी लिहून द्यावे. त्यांनी याला नकार दिला. 1952 ते 1958 पर्यंत ते देशाबाहेर प्रवास करू शकले नाहीत. विश्व शांतता काउंसीलने 1953 साली त्यांना आंतरराष्ट्रीय विश्व शांतता पुरस्काराने सन्मानित केले. पण पुरस्कार स्वीकारण्यासाठी ते युरोपला जाऊ शकले नाहीत.



अल्बर्ट आईनस्टाईन त्यांच्या बाजुने साक्ष देण्यास तयार होते.

1950 च्या दशकात दक्षिणेकडील राज्यांत काळ्या तसेच गोऱ्या लोकांदरम्यान एक नवी लोकशाहीवादी जाणीव जागृत झाली. काळ्या लोकांसोबत केल्या जाणाऱ्या भेदभावाला अनेक शहरांतून विरोध होऊ लागला. काळ्या लोकांनी केलेल्या वर्णभेदविरोधी चळवळी व्यापक आणि अहिंसक होऊ लागल्या.

1958 साली अमेरिकेच्या सर्वोच्च न्यायालयाने घोषणा केली की पासपोर्ट मिळवण्यासाठी लोकांना आपली राजकीय निष्ठा उघड करण्याची गरज नाही. अखेरीस, ड्यू बॉइस आणि त्यांची पत्नी यांना पासपोर्ट मिळाले. त्यांनी लगेच प्रवासाची योजना बनवली.

ऑगस्ट 1958 ते जुलै 1959 या काळात दोघांनी इंग्लंड, फ्रान्स, झेकोस्लोव्हकीया, पूर्व जर्मनी, सोव्हियेत युनियन आणि चीनचा प्रवास केला. ते या देशांच्या राष्ट्राध्यक्षांना भेटले. अनेक युरोपीय विद्यापीठांनी त्यांना मानद डॉक्टरेट प्रदान करून सन्मानित केले.

या प्रवासामुळे त्यांच्या मनात साम्यवादाविषयी आदर वाढला. सोबतच त्यांना अमेरिकेच्या भांडवलशाही सरकारबद्दल चिंता वाटू लागली.

विल्यम आता एक्याण्णव वर्षांचे झाले असले तरी त्यांच्यात उर्जा सळसळत होती. त्यांना यापुढेही सतत काम करत राहाण्याची इच्छा होती.



ड्यू बॉइस चीन आणि सोव्हियेत युनियनच्या राष्ट्राध्यक्षांना भेटले.



ड्यू बॉइस दररोज पोहोण्याचा आनंद घेत असत.

# प्रवास सुरू राहिला

फेब्रुवारी 1960 मध्ये आपल्या ब्याण्णवव्या वाढदिवशी ड्यू बॉइस आणि त्यांच्या पत्नीने व्हर्जिन आयलंडमध्ये दोन आठवडे घालवले. ते दररोज सकाळी न्याहारीअगोदर समुद्रात पोहोण्याचा आनंद घेत असत.

ड्यू बॉइसला कामातून उर्जा मिळत असे. जुलै 1960 मध्ये ड्यू बॉइस पत्नीसोबत *घाणा* देशात गेले. घाणाचे राष्ट्रपती *क्वामे एन्क्रुमा* यांनी त्यांना विनंती केली की त्यांनी आफ्रिकेची संस्कृती आणि इतिहास अंतर्भूत असणारा *एनसायक्लोपीडिया आफ्रिकाना* तयार करण्यासाठी घाणामध्ये राहावे.

गेली 50 वर्षे विल्यम अशा कामाची वाट बघत होता. पण पैशाअभावी त्याला हे काम सुरू करणे जमले नव्हते. घाणाच्या राष्ट्रपतींनी आर्थिक मदतीचे वचन दिल्यावरही बॉइसला हे काम पूर्ण होईल की नाही अशी चिंता वाटत होती. तो राष्ट्रपतींना काही उत्तर न देताच न्ययॉर्कला परतला.

तो या प्रस्तावावर विचार करू लागला. दरम्यान त्याची मुलगी योलँडचा मृत्यू झाला. त्याने तिला आपली पहिली पत्नी आणि मुलाच्या कबरीजवळ ग्रेट बॅरिंग्टनमध्ये दफन केले. मग त्याने घाणाला जाण्याचा निर्णय घेतला. पण प्रवासाला निघण्याआधी त्याला आणखी एक महत्त्वाचा निर्णय घ्यायचा होता.




आफ्रो-आशियायी लेखकांचे पहिले संमेलन 1958 साली ताश्कंद येथे आयोजीत झाले.

आपल्या जगभरच्या प्रवासामुळे आणि एक समाजशास्त्रज्ञ म्हणून ड्यू बॉइसला असे वाटू लागले की जगाचा कल समाजवादाकडे झुकत चालला आहे. आदर्श समाजवादी राष्ट्रात वस्तुंचे उत्पादन गरज आणि वापर किती आहे, यावर ठरते तर भांडवलशाहीमध्ये वस्तुंचे उत्पादन नफा किती आहे, यावर ठरते.

ड्यू बॉइसच्या मते, साम्यवाद हा समाजवादाचेच टोकाचे रुप आहे आणि तो भांडवलशाहीला रोखू शकेल. रशिया आणि चीनमध्ये ज्या तऱ्हेचा साम्यवाद राबवला जात होता तसा साम्यवाद अमेरिकतही चालू शकेल, असे ड्यू बॉइसला अजिबात वाटत नव्हते. पण या देशांकडून धडे घेऊन अमेरिकी अर्थव्यवस्थेला समाजवादाची डूब देता येईल, असे त्याचे मत होते.

ऑक्टोबर 1961 मध्ये, घाणाला जाण्याअगोदर, ड्यू बॉइसने अमेरिकी साम्यवादी पक्षाला सदस्यत्वासाठी एक अर्ज लिहिला. “अमेरिकी साम्यवादी पक्षाचा मार्ग स्वच्छ आणि स्पष्ट आहे. तो अमेरिकेसमोर एक तिसरा राजकीय पर्याय ठेवेल आणि लोकशाही राबवेल,” असे त्याने या अर्जात लिहिले.

काही दिवसांनी, तो आणि शर्ली घाणाच्या आक्रा शहरात गेले. एन्क्रुमा यांनी त्यांना राहायला सात खोल्यांचे एक घर दिले. हे घर झाडा-झुडपांनी वेढलेले होते. फळबागेत संत्र्याची आणि लिंबूची झाडे होती. संध्याकाळी त्यांचा घमघमाट सुटत असे. एन्क्रुमा त्यांचे निकटचे मित्र झाले. ते वरचेवर दोघांना भेटायला येत असत.

ड्यू बॉइसने दोन वर्षे कठोर मेहनत घेऊन एन्सायक्लोपीडिया आफ्रिकानावर काम केले. पण तो अशक्त होत चालला होता. 1962 साली त्याला उपचारासाठी बुखारेस्ट आणि लंडनला जावे लागले. आपल्या सर्जरीनंतर चौऱ्याण्णव वर्षांचा विल्यम “माझ्याकडे फुकट घालवायला वेळ नाही” असे म्हणत आपल्या कामावर परतला.

27 ऑगस्ट 1963 रोजी, एन्क्रुमा ड्यू बॉइसला भेटायला आले. आपल्या आयुष्याची शेवटची वर्षे सुखाची केल्याबद्दल ड्यू बॉइसने त्यांचे आभार मानले आणि काम पूर्ण न करु शकल्याबद्दल त्यांची माफीही मागितली. खोलीच्या बाहेर पडल्यावर एन्क्रुमांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. ते ड्यू बॉइसच्या पत्नीला म्हणाले, “ऐकलंत तुम्ही? ते माझा निरोप घेत होते.” एन्क्रुमा गेल्यावर शर्ली आपल्या पतीच्या खोलीत गेली आणि पतीचा हात हाती घेऊन त्याच्याजवळ बसली. विल्यम झोपी गेला आणि मग पुन्हा कधीच जागा झाला नाही.




*एन्सायक्लोपीडिया आफ्रिकाना* आफ्रिकेच्या संस्कृतीचा इतिहास असून तो प्रागैतिहासिक काळापासून आधुनिक काळातील उद्योग आणि कला क्षेत्रातील आफ्रिकेची प्रगती यांवर प्रकाश टाकतो.



त्या दिवशी ड्यू बॉइस आणि इतर लोकांचा उत्साह आणि प्रभाव स्पष्टपणे दिसून आला.

मृत्युच्या पुढल्या दिवशी, डब्ल्यू. ई. बी. ड्यू बॉइसचा जनसागरामध्ये किती प्रभाव आहे, हे स्पष्टपणे दिसून आले. त्याने आपले आयुष्य वर्णभेदाचा पडदा टराटरा फाडून टाकण्यासाठीच खर्च केले होते. त्या दिवशी, वॉशिंग्टन डी. सी. मध्ये 2,50,000 काळे लोक जमले होते. त्यांनी मार्टीन ल्यूथर किंग यांचे प्रसिद्ध *माझं एक स्वप्न आहे* हे भाषण ऐकले.

एन्एएसीपीच्या कार्यकारी संचालकांनी घोषणा केली की ज्या महान व्यक्तिच्या कार्यामुळे आज एवढे लोक जमू शकले त्यांचे काल रात्री घाणामध्ये निधन झाले.

काही लोक ड्यू बॉइस हे काळाच्या खूप पुढे होते, असे मानत. हे लोक त्यांना *प्रेषीत* म्हणत. कारण त्याला इतरांना न दिसणाऱ्या गोष्टी दिसत असत. ते वेगवेगळ्या संस्कृती, वेगवेगळ्या विचारसरणी यांच्यापासून पळ काढत नसत. ते त्यांना समजून घेण्याचा प्रयत्न करत. कारण त्यांना सत्याचा शोध घेण्याचे भय वाटत नव्हते. आपले सिद्धांत चुकीचे ठरले तर ते त्यांचा त्याग करत. त्यांनी आपले आयुष्य लोकांना समजून घेण्यात आणि सगळे शांततेने राहू शकतील असा मार्ग शोधण्यात खर्च केले.

समाप्त